केंद्रवर्ती अर्थसंकल्प योजनेंतर्गत (न्युक्लिअस बजेट) सन २०२४-२५ या आर्थिक वर्षातील निधी वितरित करण्याबाबत..

**महाराष्ट्र शासन**

**आदिवासी विकास विभाग**

**शासन निर्णय क्रमांक : न्युबयो-२०२४/प्र.क्र.१०४ /का.९**

मादम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,

मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.

दिनांक : १९ मार्च, २०२५

**वाचा :-**

१. शासन निर्णय, आदिवासी विकास विभाग क्रमाकः न्युबयो-२०११/प्र.क्र.८७/ का.७, दि.२१ जून,२०१३
२. शासन निर्णय, आदिवासी विकास विभाग क्रमाकः आविवि-२०२२/प्र.क्र.९५/का-०९, दि.११ जूलै,२०२३
३. आयुक्त, आदिवासी विकास महाराष्ट्र राज्य, नाशिक यांचे पत्र क्र.विकास-२०२४/ प्र.क्र.३१/ का.३(२)/५८७०,दि.२९ ऑगस्ट,२०४ व पत्र क्र.विकास-२०२४/ प्र.क्र.३१/ का.३(२)/६१६३ ,दि.०६ सप्टेंबर,२०२४
४. शासन निर्णय क्र.न्युबयो-२०२४/प्र.क्र.१०४/का-०९,दि.१५ ऑक्टोबर,२०२४

**प्रस्तावना :-**

केंद्रवर्ती अर्थसंकल्प योजने अंतर्गत ज्या योजना आदिवासी विकास किंवा कल्याणाच्या दृष्टीने स्थलकालानुरुप आवश्यक आहेत आणि त्या योजनांचा समावेश अर्थसंकल्पात नाही अशा अभिनव स्वरुपाच्या स्थानिक महत्वाच्या योजना, तांत्रिक औपचारिकतेमुळे दीर्घ कालावधीकरीता अडकून न पडता स्थानिक पातळीवर तातडीने आणि प्रभावीपणे कार्यान्वित करुन त्यांचा लाभ गरजू आदिवासींना प्रत्यक्ष मिळवून देण्यासाठी योजना राबविण्यात येतात.

वाचा मधील अनु.क्र.३ मधील पत्रानुसार आयुक्त,आदिवासी विकास,नाशिक यांनी केंद्रवर्ती अर्थसंकल्प योजनेसाठी सन २०२४-२५ या आर्थिक वर्षासाठी संबधित अपर आयुक्त,आदिवासी विकास निहाय निधीची मागणी केलेली आहे.

वाचा मधील अनु.क्र.४ मधील शासन निर्णयानुसार केंद्रवर्ती अर्थसंकल्प योजनेसाठी रु.३०००.०० लक्ष निधी आयुक्त,आदिवासी विकास नाशिक यांना वितरित करण्यात आलेला आहे. सद्यस्थितीत वित्त विभागाने केंद्रवर्ती अर्थसंकल्प योजनेसाठी रु.५०००.०० लक्ष निधी वितरणासाठी

उपलब्ध करून दिलेला आहे. सदर निधी आयुक्त,आदिवासी विकास,नाशिक यांना वितरित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

केंद्रवर्ती अर्थसंकल्प योजनेंतर्गत सन २०२४-२५ या आर्थिक वर्षातील अर्थसंकल्पीय तरतूदीमधून वितरणासाठी उपलब्ध असलेला रु. ५०००.०० लक्ष **(अक्षरी रु.पन्नास कोटी फक्त) आयुक्त,आदिवासी विकास,नाशिक यांना** खालील अटी व शर्तींच्या अधीन राहून मान्यता देण्यात येत आहे.

**अटी व शर्ती :**

१. आयुक्त,आदिवासी विकास नाशिक यांनी सदर निधी संबधित अपर आयुक्त,आदिवासी विकास यांना खालीलप्रमाणे वितरित करावा.

| **अ.क्र.** | **अपर आयुक्त कार्यालय** | **वितरित करावयाचा निधी रु.लक्ष** |
|---|---|---|
| १ | नागपूर | ३४३२.०० |
| २ | अमरावती | १५६८.०० |
| **एकूण** | | **५०००.००** |

२. संबधितांनी सदर निधी हा केंद्रवर्ती अर्थसंकल्प योजनेच्या सन २०२४-२५ या वर्षाच्या वार्षिक कृती आराखड्यात समाविष्ट योजनांवरच खर्च करावा.

३. वाचा मधील अनु.क्र.१मधील तरतूदीनुसार योजनेंतर्गत मंजूरीचे वित्तीय अधिकारानुसार कार्यक्रमांस मंजूरी देणारे सक्षम अधिकारी यांची मान्यता घेण्यात यावी.

४. वाचा मधील अनु.क्र.१ व २ मधील शासन निर्णय नुसार निश्चित करण्यात आलेल्या कार्यपद्धती तसेच विहित केलेल्या अटी, शर्ती व सुचनांची कटाक्षाने अंमलबजावणी करण्यात यावी. या शासन निर्णयातील तरतूदींचा भंग होणार नाही याची दक्षता घेण्यात यावी. सदर शासन निर्णयातील अटी व शर्तींची पुर्तता न करणारी कामे कृती आराखड्यातून वगळण्यात यावी.

५. सदरील योजनांची अंमलबजावणी करतांना सार्वत्रिक निवडणूकांसाठी आचारसंहिता अंमलात नाही याबाबत संबधितांनी खात्री करावी.

६. मान्य योजनांच्या वित्तीय मर्यादेतच खर्च करावा.

७. सदर निधी सन २०२४-२५ या आर्थिक वर्षातच खर्च करण्यात यावा.

८. वरील बाबींवर होणारा खर्च मागणी क्र. टी-५, याखाली मुख्य लेखाशीर्ष २२२५ अनुसूचित जाती, अनुसूचित जमाती, इतर मागासवर्ग व अल्पसंख्याक यांचे कल्याण (०१) (३४) जनजाती उपयोजना क्षेत्राकरिता केंद्रवर्ती अर्थसंकल्प (कार्यक्रम) २२२५ १७०४,५० इतर खर्च लेखाशीर्षाखाली सन २०२४-२५ या आर्थिक वर्षात उपलब्ध होणा-या तरतूदीतून भागविण्यात यावा व त्याच लेखाशीर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा.

२. सदर शासन निर्णय हा वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.२४०/२०२५,व्यय-१४, दि.१०/०३/२०२५ अनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२५०३१९१३०९५३६५२४ असा आहे. हा आदेश डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

SATISH VITHALRAO KOVE

Digitally signed by SATISH VITHALRAO KOVE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=TRIBAL DEVELOPMENT DEPARTMENT, 2.5.4.20=e13b027a7b550970150cf7dc69d276db3b1a6ebe3f71610fb5e8ff55b1676c8a, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=CE18732734BA0742D7712775E8F0AD400558E8748375399762FD447C3E9AC1EB, cn=SATISH VITHALRAO KOVE
Date: 2025.03.19 13:11:03 +05'30'

**( सतिश कोवे )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा. राज्यपालांचे सचिव, राजभवन, मुंबई.
२. मा. मुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य यांचे प्रधान सचिव.
३. मा. उप मुख्यमंत्री (गृह), महाराष्ट्र राज्य यांचे सचिव.
४. मा. उप मुख्यमंत्री (वित्त व नियोजन), महाराष्ट्र राज्य यांचे सचिव.
५. मा. अध्यक्ष व मा. उपाध्यक्ष, विधान सभा, विधान भवन, मुंबई.
६. मा. सभापती व मा. उपसभापती, विधान परिषद, विधान भवन, मुंबई.
७. मा. मंत्री, आदिवासी विकास विभाग, यांचे खाजगी सचिव.
८. मा. राज्यमंत्री, आदिवासी विकास विभाग, यांचे खाजगी सचिव.
९. सचिव, आदिवासी विकास विभाग, यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.
१०.आयुक्त, आदिवासी विकास आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, नाशिक.
११. अपर आयुक्त,आदिवासी विकास,अमरावती व नागपूर
१२.सर्व सह सचिव/उप सचिव, अवर सचिव व कक्ष अधिकारी, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
१३. कक्ष अधिकारी(का-०६), आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
१४. सर्व प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प.
१५. निवड नस्ती (का-९), आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.